**जिल्हा वार्षिक योजना २०१५-१६ अंतर्गत एकात्मिक दुग्धविकास कार्यक्रमाखाली सोलापूर जिल्हयातील १५५ प्राथमिक सहकारी दूध संस्थाना संगणक सचिव खरेदीसाठी रु.१३३.३३ लक्ष प्रकल्प किंमतीच्या प्रस्तावाला प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांकः एमएलके २०१४/प्र.क्र. ४८/पदुम ८**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: १७ जून, २०१५

वाचा : १. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.एमएलके २०१०/प्र.क्र.४१३/पदुम ८,दि.२४.९.२०१०
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.एमएलके २०१०/प्र.क्र.४१३/पदुम ८, दि.८.१२.२०११
३. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांचे पत्र क्र. आदुवि-६/जिवायो/भाग ०२/२०१५-१६/ १९५, दिनांक १०.६.२०१५

**प्रस्तावना :**

जिल्हा वार्षिक (सर्वसाधारण) योजनेअंतर्गत एकात्मिक दुग्धविकास कार्यक्रम ही योजना जिल्हा नियोजन समिती मार्फत राज्यात राबविली जाते. सदर कार्यक्रमांतर्गत उपरोक्त संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गत सोलापूर जिल्हयातील १५५ प्राथमिक सहकारी दूध संस्थाना संगणक सचिव खरेदीसाठी रु.१३३.३३ लक्ष प्रकल्प किंमतीचा प्रस्ताव प्राप्त झाले असून सदर प्रस्ताव हे रु.१.०० कोटी पेक्षा अधिकचे असल्याने सदर प्रस्तावास शासनाची मान्यता देण्यात यावी अशी विनंती करण्यात आली आहे. सदर वस्तुस्थिती लक्षात घेऊन संदर्भाधिन शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या मर्यादेत आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांनी संदर्भ क्रमांक ३ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन ज्ञापन :**

राज्यात जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गत एकात्मिक दुग्धविकास कार्यक्रमाखाली सोलापूर जिल्हयातील १५५ प्राथमिक सहकारी दूध संस्थाना संगणक सचिव खरेदीसाठी रु.१३३.३३ लक्ष प्रकल्प किंमतीच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर मान्यता जिल्हा वार्षिक योजनेच्या मार्गदर्शक सूचनेनुसार तसेच महाराष्ट्र शासन, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ , भाग पहिला उप विभाग तीन मधील अनुक्रमांक ४, परिच्छेद क्रमांक २७(२) (अ) नुसार देण्यात येत आहे.

प्रकल्पासाठी संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनानुसार "संगणक सचिव" खरेदीसाठी शासन अनुदान ७५% (रु.१००.०० लक्ष) व संघ हिस्सा २५%(रु.३३.३३ लक्ष) इतका राहील.

**अटी व शर्ती :**

१) सदर प्रकल्पास दि.८.१२.२०११ रोजीच्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयातील अटी व शर्ती या कायम राहतील.

२) ज्या संस्थांना शासनाच्या इतर योजनेतून सचिव संगणक उपलब्ध झालेले आहेत अशा संस्था सदर अनुदानातून सचिव संगणक प्राप्त करण्यास पात्र राहणार नाहीत.

३) संगणक सचिव वाटप करण्यासाठी संस्था निवडताना - दूध संकलन बंद, खाजगी दूध पुरवठा, संकलन फारच कमी, दप्तर अद्ययावत नाही इ.पात्र / अपात्र निकष विचारात घेण्यात यावेत.

४) उपकरणाचे वाटप केल्यानंतर सदर संस्थेकडून दुधाची गुणप्रत तपासणी करुन दूध संकलित करण्यात येत असल्याबाबत तसेच संगणक सचिव उपकरणाचा विनियोग योग्यरित्या होत असल्याबाबत जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांनी वेळोवेळी आढावा घ्यावा.

५) उपकरणांची खरेदी करण्यासाठी आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांनी शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या पध्दतीनुसार निविदा प्रक्रियेचा अवलंब करावा.

६) सदर योजना कार्यान्वित करण्याची संपूर्ण जबाबदारी जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांची राहील व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी हे संबंधित योजनेसाठी संनियंत्रण अधिकारी राहतील.

सदरहू योजनेवरील खर्च हा जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गत "एकात्मिक दुग्धव्यवसाय कार्यक्रम" हया खाली मंजूर होणाऱ्या निधीतून भागविण्यात यावा.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१७१२०६३३०६०१ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shashank Madhav Sathe

Digitally signed by Shashank Madhav Sathe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=11a06bf85893554ac5cded657c0f1435af29a0ad118fb759493176e40002b178, cn=Shashank Madhav Sathe
Date: 2015.06.17 12:08:25 +05'30'

(श.मा.साठे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई
२. विभागीय आयुक्त, पुणे
३. जिल्हाधिकारी, सोलापूर
४. सहायक आयुक्त (लेखा) आयुक्त्, दुग्धव्यवसाय विकास यांचे कार्यालय, वरळी, मुंबई
५. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, पुणे विभाग, पुणे
६. जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, जि.सोलापूर

७. महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. जिल्हा नियोजन अधिकारी, सोलापूर
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
११.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवडनस्ती